राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य
संस्थामधील भटक्या कुत्र्यांना प्रतिबंध
करण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१५/प्र.क्र.३६१/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २२ नोव्हेंबर, २०१६.

वाचा :- १) The prevention of Cruelty of Animals Act, 1960
२) The Animal Birth Control (Dogs) Rules, 2001

**शासन परिपत्रक :-**

सन २०१५ च्या पहिल्या ( अर्थसंकल्पीय ) अधिवेशनात सर्वश्री. संग्राम थोपटे व इतर विधान सभा सदस्य यांनी "कुत्रा चावल्यानंतर रेबीज रोगाची लागण होऊ नये म्हणून ॲन्टी रेबीज ही लस उपलब्ध करून देणे" या विषयासंदर्भात उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचनेवरील चर्चेच्या वेळी भटक्या कुत्र्यांना प्रतिबंध करताना येणाऱ्या अडचणीच्या अनुषंगाने "बेवारस कुत्र्यांची संख्या कमी करणे, कुत्र्यांवर वैद्यकीय उपचार करण्याबाबत स्थानिक स्वराज्य संस्थेच्या माध्यमातून कडक कारवाई करण्याची गरज असून अशी कार्यवाही करण्याबाबत त्यांना योग्य सूचना दिल्या जातील" असे शासनातर्फे आश्वासन देण्यात आलेले होते.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील भटक्या कुत्र्यांसंदर्भात केंद्र शासनाच्या The prevention of Cruelty of Animals Act, 1960 व The Animal Birth Control (Dogs) Rules, 2001 ची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. तसेच भटक्या कुत्र्यांमुळे होणाऱ्या उपद्रवाकरीता आवश्यक उपाययोजना करण्यात याव्यात.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१६११२४१७२१०८६८२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.24 17:23:22 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१३) निवडनस्ती (नवि-२०)